अपर जिल्हाधिकारी संवर्गातील
अधिकाऱ्यांच्या प्रतिनियुक्तीने पदस्थापनेबाबत

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन आदेश क्र. बदली-२०२३/प्र.क्र.१००/ई-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २९ ऑगस्ट, २०२३

**संदर्भ**:- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.
२) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग क्र. एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९ /कार्या.१२, दि. १४.०७.२०२१.
३) शासन आदेश, समक्रमांक, दिनांक २७.०७.२०२३.

**शासन आदेश :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. २ येथील अधिसूचनेमधील नियम क्र. २ (२) (ग) नुसार अतिरिक्त जिल्हाधिकारी व अतिरिक्त जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) या संवर्गास विभागीय संवर्ग वाटप नियम, २०२१ हे लागू होणार नाहीत, असे स्पष्ट केले आहे.

२. सबब, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) (एक) (दोन) व ४ (५) मधील तरतुदींनुसार, अपर जिल्हाधिकारी संवर्गातील बदलीपात्र/विनंतीनुसार/नियुक्तीच्या प्रतिक्षेतील खाली नमूद केलेल्या अधिकाऱ्याची संदर्भ क्र. ३ येथील आदेशामध्ये अंशत: सुधारणा करुन, त्यांच्या नावांसमोर स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने प्रथमत: ३ वर्षाकरीता प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| क्र. | अधिकाऱ्याचे नाव | संदर्भ क्र.३ अन्वये दर्शविलेली पदस्थापना | या आदेशान्वये सुधारीत पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | **श्री. विजयसिंह शंकरराव देशमुख** | **अपर जिल्हाधिकारी, अंबाजोगाई, जि. बीड** | **अपर जिल्हाधिकारी, सिडको येथे प्रतिनियुक्तीने प्रथमत: ३ वर्षाकरीता** |

३. श्री. विजयसिंह देशमुख, अपर जिल्हाधिकारी यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी प्रथमत: तीन वर्षाकरीता असेल. सदर प्रतिनियुक्तीच्या पदावर रूजू होण्याकरीता श्री. देशमुख यांच्या सेवा नगरविकास विभागाकडे वर्ग करण्यात येत असून त्यांनी प्रधान सचिव, (नवि-१), नगरविकास विभाग यांचेकडे तात्काळ हजर व्हावे.

४. प्रतिनियुक्तीने नियुक्त करण्यात आलेल्या श्री. देशमुख यांना सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.१७.१२.२०१६ व शासन निर्णय दिनांक १६.०२.२०१८ मधील प्रतिनियुक्तीच्या धोरणातील विहित अटी व शर्ती लागू राहतील.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहीत केलेल्या तरतूदींनुसार, पदस्थापनेच्या ठिकाणी पदग्रहणाकरीता संबंधित अधिकारी यांना रविवार आणि सार्वजनिक सुट्ट्या धरून **सात दिवसांचा कालावधी तयारीसाठी दिला जातो** व **त्याशिवाय, प्रत्यक्ष कालावधीची गणना** पुढीलप्रमाणे करण्यात येईल :-

**(ए) त्याच जिल्ह्यामध्ये किंवा लगतच्या जिल्ह्यामध्ये** (म्हणजेच, कोणत्यातरी ठिकाणी सामायिक हद्द असणारा जिल्हा) एखाद्या ठिकाणी बदली झाली असता प्रवासासाठी **एक दिवस**;

**(बी)** वरील खंड (ए) मध्ये उल्लेखिलेल्या ठिकाणाव्यतिरिक्त **अन्य ठिकाणी** बदली झाली असता प्रवासासाठी **दोन दिवस** एवढा पदग्रहण अवधी संबंधित अधिकाऱ्यास अनुज्ञेय राहील.

परंतु, प्रस्तुत आदेशातील अधिकारी हे नियुक्तीच्या प्रतिक्षेत असल्याने त्यांना पदग्रहण अवधी अनुज्ञेय राहणार नाही.

६. संबंधित अपर जिल्हाधिकारी यांना कळविण्यात येते की, नवीन नियुक्तीच्या जागी रुजू झाल्याबाबतचा अहवाल e1.revenue@maharashtra.gov.in तसेच, vijay.yadav82@nic.in या ई-मेलवर शासनास त्वरीत कळवावे.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०८२९११५५१४३९१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJAY RAMDAS YADAV

Digitally signed by VIJAY RAMDAS YADAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=ae4129cf04c57690cc0afe91f5a7ee83c834bf8ec9081fb5049d136688772be0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8BA1246ACA7B45D7883D90B3708953920A07AF440E2B9BF6B4A2506BDB374442, cn=VIJAY RAMDAS YADAV
Date: 2023.08.29 12:21:00 +05'30'

**( विजय रा. यादव )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३. मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन यांचे सहसचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६. मा. अपर मुख्य सचिव (महसुल), महसुल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

७. मा. प्रधान सचिव (नवि-१), नगरविकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१-मुंबई/२-नागपूर
९. अधिदान लेखा अधिकारी/निवासी लेखा अधिकारी (संबंधित)
१०.संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
११.संबंधित अपर जिल्हाधिकारी
१२.सह सचिव (ई-१) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३.महसूल व वन विभाग कार्यासन ई-४ ई-४-अ, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
१४.निवडनस्ती-कार्यासन ई-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

-*-*-*-